राज्यातील वरिष्ठ नागरिकांना शासकिय रुग्णालयातून
विनाशुल्क सेवा देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांक एमएजी २००४/१३८/प्रक्र २०/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक - २१ जुलै, २००४.

वाचा - १) शासन निर्णय, सा.आ.वि.क्रमांक एचएफआर १०८७/३६५३/ आरोग्य-९, दिनांक २/२/८८.
२) शासन निर्णय, सा.आ.वि.क्र.जीरुफी-१०००/प्रक्र ९०/आरोग्य-३, दिनांक १० जुलै,२००१
३) संचालनालय, आरोग्य सेवा,मुंबई यांचे क्रमांक संआसे/जेष्ठ नागरिक/सुविधा/ कक्ष-३ब/ ०४, दिनांक २७ जानेवारी,२००४
४) शासन निर्णय, सा.आ.वि.क्र.बीयुडी २००४/प्रक्र १७२/अर्थसंकल्प, दिनांक १४ जुलै २००४

**प्रस्तावना -** सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये शासकिय रुग्णालयातून देण्यात येणाऱ्या विविध रुग्णसेवेकरिता आकारण्यात येणाऱ्या शुल्कामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. तथापि या शुल्क आकारणीतून वरील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" येथील नमूद संवर्गातील व्यक्ती/लाभधारकांना रुग्णसेवा शुल्क भरण्यापासून सूट देण्यात आली आहे. राष्ट्रीय वरिष्ठ नागरिक धोरणाच्या अनुषंगाने व सामाजिक न्यायाच्या दृष्टीने राज्यातील वरिष्ठ नागरिकांचा (वय ६० वर्ष आणि त्यावरील ) समावेश या संवर्गात करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -** सामाजिक न्यायाच्या दृष्टीने राज्यातील वरिष्ठ नागरिकांना (वय ६० वर्ष व त्यावरील) शासकिय रुग्णालयात विनाशुल्क उपचाराची सवलत देण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे. यास अनुसरुन ;

(१) संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मधील शासकिय रुग्णालयात विनाशुल्क वैद्यकिय उपचारांची सवलत मिळत असलेल्या संवर्गाच्या यादीत अनुक्रमांक १५ येथे "वरिष्ठ नागरिक (वय ६० वर्षे व त्यावरील )" संवर्गाचा समावेश करण्यात येत आहे.

(२) प्रस्तुत सवलत हे आदेश निर्गमित झालेल्या दिनांकापासून लागू राहील.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५३८/०४/व्यय-१३, दिनांक १८ जून २००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्र.क. प्रधान)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति
राज्यपालांचे सचिव
सर्व विभागीय आयुक्त
प्रधान सचिव , वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, आरोग्य सेवा,मुंबई
सहसंचालक, आरोग्य, मुंबई/पुणे

रोटा प्रिंट/एच–541(1500–7–04)1

(कृ.मा.प.

सर्व मंडळाचे उप संचालक,
सर्व महाविद्यालये व दंत महाविद्यालयाचे अधिष्ठते
सर्व मनोरुग्णालय व क्षय रुग्णालयाचे अधिक्षक
सर्व स्त्री रुग्णालयाचे अधिक्षक
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक
सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व कुटीर/ग्रामीण रुग्णालयाचे वैद्यकिय अधिक्षक
प्रसिध्दी संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई (प्रसिध्दीसाठी)
* प्राथोनेटरी व सिनियर मास्टर हायकोर्ट मुंबई (पत्राने)
* रजिस्टार, हायकोर्ट ॲपिलेट साईड, मुंबई (पत्राने)
मा.लोक आयुक्त/उपलोक आयुक्त यांचे सचिव (पत्राने)
महालेखापाल (लेखा व परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखाधिकारी, मुंबई
सर्व कोषागार अधिकारी ,मुंबई
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
वित्त विभाग, (व्यय-१३) मंत्रालय, मुंबई
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
सार्वजनिक आरोग्य मंत्र्याचे स्वीय सहाय्यक
सार्वजनिक आरोग्य राज्यमंत्र्याचे स्वीय सहाय्यक
वित्त मंत्र्याचे स्वीय सहाय्यक
इतर सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक
सार्वजनिक आरोग्य विभागातील सर्व अधिकारी/सर्व कार्यासने
निवड नस्ती (आरोग्य-३) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

---